जिल्हा परिषदेच्या स्थायी व सर्वसाधारण सभांना जिल्हा परिषदेच्या सर्व संबंधित अधिकाऱ्यांनी उपस्थित राहण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
ग्राम विकास व जलसंधारण विभाग
शासन परिपत्रक क्रमांक : झेडपीए २०१०/प्र.क्र.२०३/पंरा-१
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ८ मार्च, २०११.

**प्रस्तावना** : - जिल्हा परिषदेच्या स्थायी समितीच्या सभेस जिल्हा परिषदेचे मुख्य कार्यकारी अधिकारी तसेच सर्वसाधारण सभेला संबंधित विभाग प्रमुख अनुपस्थित रहात असल्याने सभेमध्ये सदस्यांनी मागितलेली माहिती तसेच महत्वाच्या आणि विकास कामासंबंधी कुठलीही आवश्यक माहिती मिळत नाही. त्यामुळे जिल्हा परिषदेच्या सर्वसाधारण सभा व स्थायी समितीच्या सभांना सर्व संबंधित अधिकाऱ्यांनी उपस्थित राहण्यासाठी शासनाने आदेश निर्गमित करण्याबाबत जिल्हा परिषद अध्यक्ष, सभापती तसेच सदस्यांकडून शासनाकडे वारंवार मागणी करण्यात येत होती. त्याअनुषंगाने अधिकारी आणि पदाधिकारी व सदस्य यांच्यामध्यो समन्वय साधून विकास कामे जलद गतीने होण्याच्या दृष्टीने शासन पुढील निर्देश देत आहे.

**परिपत्रक** : - शासन आता या परिपत्रकाद्वारे असे आदेश देत आहे की, सार्वजनिक हिताच्या व इतर विकास कामासंबंधी चर्चा करुन निर्णय घेण्याचे अधिकार मुख्य कार्यकारी अधिकारी यांना असल्याने त्यांनी जिल्हा परिषदेच्या सर्वसाधारण सभा व स्थायी समितीच्या सभांना उपस्थित राहणे बंधनकारक आहे. तसेच सभेमध्ये सदस्यांनी उपस्थित केलेल्या मुद्यांची माहिती मिळण्याकरिता जिल्हा परिषदेतील सर्व संबंधित विभागाचे प्रमुख यांनी सर्वसाधारण सभा व स्थायी समितीच्या आयोजित सभांना उपस्थित राहणे बंधनकारक राहिल. संयुक्तिक कारणाशिवाय गैरहजर राहिल्यास संबंधितोवर महाराष्ट्र नागरी सेवा नियमान्वये शिस्तभंगाची कारवाई करण्यात येईल.

२. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक २०११०३०८१८५०२४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(डॉ. मल्लीनाथ कलशेट्टी )
उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) अध्यक्ष, जिल्हा परिषद (सर्व) द्वारा मुख्य कार्यकारी अधिकारी.
२) मा.सचिव (ग्राम विकास व पंचायत राज).
३) मा सचिव (जलसंधारण).
४) विभागीय आयुक्त (सर्व).
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व).
६) निवड नस्ती, कार्यासन क्र.पंरा-१, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.

H:/letter Doc.lwp-